


**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्र.सानुग्र-३९२१/प्र.क्र.११४/ना.पु.१५**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३ फेब्रुवारी, २०२२.

**विषय** :- कै. राजू पांडुरंग नगरकर, शिधावाटप अधिकारी, ड-परिमंडळ अंतर्गत शि.का.क्र.२६ ड अंधेरी यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर राज्यात लागू करण्यात आलेल्या संचारबंदीच्या काळात ते शासनाकडून जनतेला होणारा शिधाजिन्नसांचा पुरवठा सुरळीत व्हावा याकरीता शासन आदेशानुसार **"मदत कार्य"** करण्याचे कर्तव्य बजावत असताना कोव्हीड-१९ संसर्गाने मृत्यु झाल्यामुळे त्यांच्या कुटूंबियांना रु.५० लक्ष सानुग्रह सहाय्य मंजूरीबाबत.

**संदर्भ** :-१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१.
२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र, दि.०३.०६.२०२१ व दि.१७.०६.२०२१.

**ज्ञापन :-**

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या अधिपत्याखालील ड परिमंडळ अंतर्गत शि.का.क्र.२६-ड, अंधेरी येथे कार्यरत कै. राजू पांडुरंग नगरकर (शिधावाटप अधिकारी) यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर राज्यात लागू करण्यात आलेल्या संचारबंदीच्या काळात ते शासनाकडून जनतेला होणारा शिधाजिन्नसांचा पुरवठा सुरळीत व्हावा याकरीता शासन आदेशानुसार **"मदत कार्य"** करण्याचे कर्तव्य पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दि. १५.०४.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

२. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी उक्त मृत शिधावाटप अधिकारी कै. राजू नगरकर यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. उपनियंत्रक शिधावाटप, आस्थापना यांनी कै. राजू नगरकर, शि.अ. हे कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर राज्यात लागू करण्यात आलेल्या संचारबंदीच्या काळात ते शासनाकडून जनतेला होणारा शिधाजिन्नसांचा पुरवठा सुरळीत व्हावा याकरीता शासन आदेशानुसार **"मदत कार्य"** करण्याचे कर्तव्य बजावत होते, असे नमूद केले आहे.

४. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई व उपनियंत्रक शिधावाटप, ड परिमंडळ यांनी कै. राजू नगरकर यांना लाइफ लाईन मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल आणि ट्रामा सेंटर, औरंगाबाद येथे दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात म्हणजे दि.२६.०३.२०२१ पर्यंत ते कार्यालयात कर्तव्यावर हजर होते, असे प्रमाणित केले आहे.

५. **लाइफ लाईन मल्टीस्पेशालिटी हॉस्पिटल आणि ट्रामा सेंटर, औरंगाबाद** यांनी कै. राजू नगरकर यांचा मृत्यू हा "कोव्हीड -१९" या रोगाच्या संसर्गामुळे झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

६. **उप निबंधक (जन्म व मृत्यू) नोंदणी कार्यालय, औरंगाबाद महानगरपालिका** यांनी कै. नगरकर यांचा मृत्यू हा दि.**१५.०४.२०२१** रोजी झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

७. कै. राजू नगरकर यांच्या **पत्नी श्रीम. धनश्री राजू नगरकर** यांनी रु.५०.०० लक्ष सानुग्रह अनुदान मिळणेबाबतचा दि.०३.०५.२०२१ रोजीचा **विनंती अर्ज** उपनियंत्रक, शिधावाटप, ड-परिमंडळ यांना सादर केलेला आहे.

८. त्यानुसार नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या अधिपत्याखालील ड परिमंडळ अंतर्गत शि.का.क्र.२६-ड, अंधेरी येथे कार्यरत तत्कालीन शिधावाटप अधिकारी कै. राजू पांडुरंग नगरकर यांच्या कुटुंबियांना रक्कम रु.५०.०० लक्ष/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

९. उक्त खर्च "**मागणी क्र.एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८, अन्न साठवण व वखार साठवण (०१) अन्न (१०१) प्रापण व पुरवठा (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र ( २४०८ ००६४), (१३)-कार्यालयीन खर्च**" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदरचे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०२०३१६१८४९५६०६ असा आहे. सदर ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2022.02.03 16:20:10 +05'30'

**(गजानन रा. देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा,मुंबई.

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) आहरण व संवितरण अधिकारी, उपनियंत्रक शिधावाटप, ड-परिमंडळ यांचे कार्यालय, मुंबई .
२) लेखा व अधिदान अधिकारी यांचे कार्यालय, मुंबई.

**प्रत माहितीस्तव-**

१) उपनियंत्रक शिधावाटप, ड-परिमंडळ.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

३) वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय,अ.ना.पु.व.ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.

४) श्रीम. धनश्री राजू नगरकर (पत्नी), बी-००३, सर्वोदय पार्क, स्वामी समर्थ मठाजवळ, नांदिवली रोड, डोंबिवली (पूर्व), ठाणे-४०० ६०१.

५) निवडनस्ती, ना.पु.१५.